**श्री. रामदेवबाबा सार्वजनिक समिती, नागपूर या प्रायोजक मंडळाच्या स्वयं अर्थसहाय्यित रामदेवबाबा विद्यापीठ, नागपूर या विद्यापीठाच्या अनर्जित रकमेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: स्वअवि-२०१८/प्र.क्र.१०९/विशि-४**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग
मंत्रालय, मुंबई : ४०००३२.
दिनांक : ०८ ऑगस्ट, २०२३.

**संदर्भ:-** शासन निर्णय क्र.: स्वअवि-२०१८/प्र.क्र.१०९/विशि-४, दिनांक २० ऑगस्ट, २०१९.

**प्रस्तावना** :-

श्री रामदेवबाबा सार्वजनिक समिती, नागपूर या प्रायोजक मंडळास शैक्षणिक प्रयोजनासाठी शासकीय जमीन देण्यात आली होती. मंत्रीमंडळाच्या दिनांक १३ ऑगस्ट, २०१९ रोजीच्या बैठकीत शासकीय जमीनीवर विद्यापीठ स्थापन करताना १० टक्के अनर्जित रक्कम आकारण्याचा निर्णय घेण्यात आला होता. त्यानुषंगाने २० ऑगस्ट, २०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये रामदेवबाबा विद्यापीठ, नागपूर यांना १० टक्के अनर्जित रक्कम जिल्हाधिकारी, नागपूर यांचेकडे जमा करण्याबाबत कळविण्यात आले होते.

रामदेवबाबा विद्यापीठ, नागपूर या स्वयं अर्थसहाय्यित विद्यापीठ स्थापन होताना जमीनीचे हस्तांतरण होत नसल्याने १० टक्के अनर्जित रक्कम लागू होणार नसल्याने दिनांक २० ऑगस्ट, २०१९ रोजीचा शासन निर्णय अधिक्रमित करण्याबाबत दिनांक १६ जुलै, २०२३ रोजीच्या मंत्रीमंडळ बैठकीत निर्णय घेण्यात आला असून या निर्णयानुसार दिनांक २० ऑगस्ट, २०१९ रोजीचा शासन निर्णय अधिक्रमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

श्री रामदेवबाबा सार्वजनिक समिती, नागपूर या प्रायोजक मंडळाला मौजा झिंगाबाई टाकळी येथील खासरा क्र.२९२, २९३ न.भू.क्र.१३२३ आराजी ४.४६ हेक्टर आर. (११.२ एकर) व खसरा क्र. २९१ येथील (५.७५ एकर) या जमिनीवर रामदेवबाबा विद्यापीठ, नागपूर या स्वयं अर्थसहाय्यित विद्यापीठाची स्थापना करताना आकारण्यात आलेल्या अनर्जित रकमेबाबतचा प्रस्ताव मंत्रीमंडळाच्या विचारार्थ घेण्यात आला.

प्रस्तुत प्रकरणाच्या अनुषंगाने वित्त विभाग, महसूल विभाग तसेच विधी व न्याय विभागाचे अभिप्राय विचारात घेऊन आणि प्रायोजक मंडळ हे विद्यापीठाच्या नावे जमिनीचे हस्तांतरण करणार नसल्याची बाब विचारात घेऊन या प्रकरणी १० टक्के अनर्जित रक्कम लागू होणार नसल्याबाबतचा

निर्णय शासनाने घेतला आहे. सदर निर्णयास अनुसरून यासंदर्भातील २० ऑगस्ट, २०१९ चा शासन निर्णय या शासन निर्णयाद्वारे अधिक्रमित करण्यात येत आहे.

रामदेवबाबा विद्यापीठ, नागपूर हे या स्वयं अर्थसहाय्यित विद्यापीठासाठी भाडेपट्ट्याने दिलेले ११.०२ एकर व अतिक्रमण नियमानुकुल केलेली ५.७५ एकर या जमिनीवर शासनाचे Proprietary Rights अबाधित राहतील.

श्री रामदेवबाबा सार्वजनिक समिती, नागपूर या संस्थेस प्रदान केलेली मौजे झिंगाबाई टाकळी, तहसिल-नागपूर शहर येथील खसरा क्र. २९२, २९३ येथील ११.०२ एकर व खसरा क्र. २९१ येथील ५.७५ एकर या जमिनीच्या प्रदान आदेशात व अतिक्रमण नियमानुकुल आदेशात ज्या अटी व शर्ती टाकण्यात आलेल्या आहेत, त्या कायम राहतील.

सदरहू विद्यापीठ शासनाने प्रदान केलेल्या जमीनीवर स्थापन होणार असल्याने समाजहित विचारात घेऊन विद्यार्थ्यांकडून फी आकारण्यात यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०८०८११४३२४४७०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

AJIT MADHUKARRAO BAWISKAR

Digitally signed by AJIT MADHUKARRAO BAWISKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT, 2.5.4.20=deb455609479b6c7f30e7f1f9a8360c0f8600a542859e8fe229d6ea333415e8d, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=99EB928028DF71EBDFCD2898E209D499192AD3899261FEAD42F7D38A3141AB69, cn=AJIT MADHUKARRAO BAWISKAR
Date: 2023.08.08 11:44:28 +05'30'

**( अजित बाविस्कर )**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१. मा.मंत्री, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई :-४०००३२.
२. मा.अपर मुख्य सचिव(वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई :-४०००३२.
३. मा.अपर मुख्य सचिव(महसूल), महसूल विभाग, मंत्रालय, मुंबई :-४०००३२.
४. मा. प्रधान सचिव (उ. व तं. शि.), उच्च व तंत्र शिक्षण, मंत्रालय, मुंबई :-४०००३२.
५. मा. सचिव, विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
६. विभागीय आयुक्त, नागपूर विभाग, नागपूर.
७. जिल्हाधिकारी, नागपूर.
८. सह सचिव, उच्च शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
९. अध्यक्ष, श्री रामदेवबाबा सार्वजनिक समिती, नागपूर.
१०.निवडनस्ती.